**तांडा/ वस्ती सुधार योजना**

दलित वस्ती सुधार योजनेच्या धर्तीवर तांडा / वस्ती सुधार योजना सुरु करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,**

शासन निर्णय क्रमांकः इमाव २००३/प्र.क्र. २०५/मावक-३

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ७ जून, २००३

वाचा :- १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक : एससीडब्ल्यु १०७४/५८/का-५, दि.१४ जून १९७४.

२) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांकः युटीए १०९४/प्र.क्र.२२९/ मावक-२, दि.१६/१०/१९९५

३) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांकः दवसु १०९८/प्र.क्र.३५३/ मावक-२, दि.४ मार्च, १९९९

४) संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा क्रमांकः विजाभज/नियोजन/२००२/का.अर्थसंकल्प/का-३, दिनांक जुलै, २००२

५) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः बीजीटी २००३/प्र.क्र.४७/अर्थसंकल्प, दि.५.४.२००३

**प्रस्तावना :-** महाराष्ट्रात भटक्या जमातीच्या अनेक जाती जमाती अजुनही भटकंती करुन स्थलांतरीत स्वरुपाचे जीवन जगतात. लमाण , बंजार, धनगर, पारधी अशा अनेक समुहांचे तांडे/ वस्त्या असून अशा तांडयांमध्ये या जमाती अनेक वर्ष रहात असल्या तरी अशा तांडया किंवा वस्त्यांना प्राथमिक सुविधा उपलब्ध होत नाहीत व त्यामध्ये अधुनिकतेकडे कल असला तरी बहुसंख्य समाज गरीबीचे जीवन जगत आहे. त्यासाठी तांडे, वाडी किंवा वस्त्या यामध्ये या समाजास स्थिर जीवन जगता यावे याकरीता सुधारणा होणे आवश्यक आहे. अनुसूचित जातीच्या वसाहतीत "दलित वस्ती सुधारणा योजना" सन १९७२ पासून राबविण्यात येत आहे व या योजनेची फलश्रुती चांगली असल्याचे मुल्यमापनात आढळून आलेले आहे. ही बाब विचारात घेऊन दलित वस्ती सुधारणेच्या योजनेच्या धर्तीवर राज्यातील भटक्या समाजाच्या सुधारणेसाठी तांडा/ वस्ती सुधार योजना सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** राज्यात अनुसूचित जातीसाठी राबविण्यात येणाऱ्या "दलित वस्ती सुधार योजना" या योजनेच्या धर्तीवर राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग याकरीता खालील नमुद केलेल्या निकषांच्या आधारे व अंमलबजावणीबाबतच्या मार्गदर्शक तत्वानुसार राज्यात "तांडा/ वस्ती सुधार योजना" सन २००३-०४ या वित्तीय वर्षापासून सुरु करण्यास शासन मंजुरी देत आहे.

२. योजनेचे निकष आणि अंमजबजावणी कार्यपध्दती :-

अ) योजनेच्या अनुदानाचे सूत्र खालीलप्रमाणे राहील :-

| | |
|---|---|
| १) ५० ते १०० लोकसंख्या असलेले तांडे/वस्त्या | रु.२,००,०००/- |
| २) १०० ते १५० लोकसंख्या असलेले तांडे/वस्त्या | रु.३,००,०००/- |
| ३) १५० पेक्षा अधिक लोकसंख्या असलेले तांडे/वस्त्या | रु.५,००,०००/- |

ब) त्यामध्ये खालील पायभूत सुविधा पुढे दर्शविलेल्या अग्रक्रमाने देण्यात याव्यात :-

१) विद्युतीकरण २) पिण्याचे पाणी ३) अंतर्गत रस्ते ४) गटारे ५) शौचालये तसेच वाचनालय व शक्य असेल तेथे मुख्य रस्त्याला जोडणाऱ्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात यावीत.

कार्यपध्दती :- १) ज्या ग्रामिण भागातील गावाजवळ व नागरी भागातील शहरा जवळ असे तांडे किंवा वस्त्या वसल्या असतील अशा वस्त्या काही वेळेला गायरान जमीनीवर वसलेल्या असु शकतात. अशांच्या बाबतीत ही योजना राबवितांना सदर तांडयातील वस्ती करत असलेल्या समुहाने तांडा वस्ती सुधार योजना राबविण्याबाबत ठराव करुन तो संबंधित ग्रामपंचायतीला सादर करावा. तेथील ग्रामसेवकांनी तो ठराव संबधित पंचायत समितीला सादर करावा. पंचायत समितीच्या सार्वजनिक बांधकाम अभियंता यांनी तपासणी करुन त्याबाबतचा योजना आरखडा तयार करुन सभापतींच्या शिफारशीद्वारे तो जिल्हा परिषद स्तरावर जिल्हा समाज कल्याण अधिकारी (गट-अ) , जिल्हा परिषद यांच्याकडे सादर करावा व समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांनी उपअभियंता स्तरावर /जिल्हा परिषद स्तरावर त्यास मान्यता घेऊन तो विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांजकडे पाठवावा. विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी सदर प्रस्ताव प्रशासकीय व आर्थिक मंजुरीसाठी संचालक,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अंतिम मंजुरीसाठी सादर करावा.

२) विभागीय समाज कल्याण अधिकारी, विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी व समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांचे या कामावर प्रत्यक्ष नियंत्रण राहील व ते आपल्या कामाच्या प्रगतीचा अहवाल संचालक,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना व शासनास सादर करतील.

३) पायाभूत सुविधांचा पॅटर्न स्थानिक परिस्थिती व गरज लक्षात घेऊन ग्रामपंचायतीने ठरवावा. बांधकामाचे नमुने व नकाशे पंचायत समितीचे कनिष्ठ अभियंता यांनी तयार करावेत.

४) ग्राम सेवक, गट विकास अधिकारी आणि विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांचे नांवे बँकेचे संयुक्त खाते उघडून त्याअंतर्गत कामाचे पैसे अदा करावेत व त्याचा हिशोब ठेवावा.

५) या कामासाठी मंजूर करण्यात आलेली रक्कम कोणत्याही परिस्थितीत इतर प्रयोजनासाठी वळवता येणार नाही.

३. तांडा / वस्ती सुधार योजनेसाठी सन २००३-०४ या वर्षात रु.१५०.०० लाख (रुपये एक कोटी पन्नास लाख) इतकी तरतूद शासनाने उपलब्ध करुन दिली असून त्याबाबतचे नियंत्रक अधिकारी म्हणून संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांजकडे सदरहू तरतूद शासन ज्ञापन, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः बीजीटी २००३/प्र.क्र.४७/अर्थसंकल्प, दि.५.४.२००३ अन्वये सुपूर्द करण्यात आलेली आहे.

४. याबाबत होणारा खर्च "मागणी क्रमांक एन - ४ यासाठी होणारा खर्च २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण- ८० सर्वसाधारण- १०२ स्वयंसेवी संस्थांना मदत- ८००- इतर खर्च -पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१)(०५) तांडा / वस्ती सुधार योजना विजाभज/विमाप्र (२२२५ ३३२ २ ) ४१- सहाय्यक अनुदाने मागणी क्र.एन-४" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून त्याअंतर्गत सन २००३-०४ या वित्तीय वर्षात केलेल्या आर्थिक

तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९६६०/व्यय-१४ दि. ८.५.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

वैअपारकर

**(वै.अ.पारकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री / राज्यमंत्री (वि.जा.भ.ज.) यांचे खाजगी सचिव
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी
सर्व जिल्हाधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी (गट-अ) जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता)१/२, मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरिक्षा)१/२, मुंबई/ नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (त्यांना विनंती की, यासाठी योग्य ती प्रसिध्दी द्यावी).
निवड नस्ती/ मावक-३.